राष्ट्रीय कृषि सिंचन विकास योजना - कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक योजनेकरिता सर्वसाधारण प्रवर्गाचा ₹१५२.१४ कोटी इतका निधी वितरित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक : कृवपदुम-२५०१६/३/२०२५-MAG-१४A
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २१ मार्च, २०२५

वाचा -

१. प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या केंद्र शासनाने सन २०२३ करिता निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.
२. कृषि व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.५-१/२०२२-RKVY, दि.०६ एप्रिल, २०२२.
३. कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.७-१/२०२४- RKVY, दि.१४ मे, २०२३.
४. केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.७-१/२०२३-RKVY/१, दि. ०१ ऑगस्ट, २०२३.
५. राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया राज्यस्तरीय मंजुरी समितीच्या (SLSC) दि.०३ मे, २०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
६. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-०५२४/प्र.क्र.१२४/१४-अे, दि. १६ मे, २०२४
७. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-०५२४/प्र.क्र.१२४/१४-अे, दि. २१ जुन, २०२४
८. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-०५२४/प्र.क्र.१२४/१४-अे, दि. १२ जुलै, २०२४
९. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-०६२४/प्र.क्र.१४१/१४-अे, दि. ०९ जुलै, २०२४
१०. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-०६२४/प्र.क्र.१४०/१४-अे, दि. ३१ जुलै, २०२४
११. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-०६२४/प्र.क्र.१४१ (भाग-१)/१४-अे, दि.३१ जुलै, २०२४.
१२. कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.१-१५/२०२४- RKVY/१, दि. ११ सप्टेंबर, २०२४.
१३. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.राकृवि-०४२४/प्र.क्र.९२/१४- अे, दि. २७ सप्टेंबर, २०२४.
१४. कृषि व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.१-१५/२०२४-RKVY, दि.१७ जानेवारी, २०२५.
१५. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-०४२४/प्र.क्र.१२४/१४-अे, दि.२२.०१.२०२५.
१६. कृषि व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.१-१५/२०२४- RKVY, दि.१९ मार्च, २०२५.
१७. कृषि व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.१-१५/२०२४- RKVY, दि.२१ मार्च, २०२५.

**प्रस्तावना -**

सन २०१५-१६ पासून प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाची अंमलबजावणी राज्यात करण्यात येत आहे.

केंद्र शासनाच्या दिनांक ०६ एप्रिल, २०२२ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना-रफ्तार ची राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया या नावाने पुनर्ररचना केली असून त्यामध्ये वार्षिक कृती आराखडा आधारित व सविस्तर प्रकल्प अहवाल आधारित या दोन शाखांचा समावेश आहे. प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) हा घटक राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरियाच्या वार्षिक कृती आराखडा आधारित शाखेत अंतर्भूत केली असून सदर योजनेमध्ये केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०:४० असे आहे.

राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया योजनेंतर्गत मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील राज्य स्तरीय मंजुरी समितीने (वार्षिक कृती आराखडा आधारित) दिनांक ०३ मे, २०२४ रोजी झालेल्या बैठकीत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) या घटकाकरिता ₹६६७.५० कोटी निधीच्या कार्यक्रमास दिलेल्या मान्यतेनुसार संदर्भ क्र. ६ येथील दिनांक १६ मे, २०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रति थेंब अधिक पिक (सूक्ष्म सिंचन) योजनेच्या ₹६६७.५० कोटीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र. १४ अन्वये प्रति थेंब अधिक पीक या योजनेकरिता SLSC approved allocation ₹४०७.०० कोटी असा दर्शविण्यात आल्याने योजनेकरिता एकूण निधी ₹६७८.३३ कोटी (केंद्र हिस्सा ₹४०७.०० कोटी + राज्य हिस्सा ₹२७१.३३) उपलब्ध झाला आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्र.१६ अन्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक या योजनेच्या सर्वसाधारण प्रवर्गाकरिता उपलब्ध केंद्र शासनाचा हिस्सा ₹९१.२९ कोटी इतका निधी व त्याच्या समरुप राज्य हिस्सा ₹६०.८५ कोटी असा एकूण ₹१५२.१४ कोटी इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) या घटकासाठी सर्वसाधारण प्रवर्गाचा ₹१५२.१४ कोटी (रुपये एकशे बावन्न कोटी चौदा लक्ष फक्त) (केंद्र हिस्सा ₹९१.२९ कोटी + राज्य हिस्सा ₹६०.८५ कोटी) निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे.

(₹ कोटी)

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | एकुण |
|---|---|---|---|
| सर्वसाधारण | ९१.२९ | ६०.८५ | १५२.१४ |

०२. उपरोक्तनुसार वितरित सर्वसाधारण प्रवर्गाचा निधी पुढील लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ करिताच्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्र. डी-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>११३, कृषि अभियांत्रिकी<br>(००) (०७) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) (कें. पु.यो.) (केंद्र हिस्सा ६०%) (सर्वसाधारण) (कार्यक्रम)<br>(२४०१ २५०४),<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्र. डी-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>११३, कृषि अभियांत्रिकी<br>(००) (२१) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) (कें.पु.यो.) (राज्य हिस्सा ४०%) (सर्वसाधारण) (कार्यक्रम)<br>(२४०१ ए९९६),<br>३३, अर्थसहाय्य |

०३. सदर निधीचे वितरण करण्याकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक योजनेच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

०५. सदर योजनेच्या लाभार्थ्यांची निवड महा-डीबीटी प्रणालीद्वारे करण्यात यावी व लाभार्थ्यांना अनुदानाचे वाटप आधार संलग्न बँक खात्यावर करण्याकरिता सार्वजनिक वित्त व्यवस्थापन प्रणालीचा वापर करावा.

०६. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

०७. सदर शासन निर्णय वित्त विभागाने शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२११४५०४९०९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by AMBADAS SAHEBRAO CHANDANSHIVE
Date: 2025.03.21 14:51:43 +05'30'

**(अं.सा. चंदनशिवे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम)), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन, राज्य उत्पादन शुल्क), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा. विरोधी पक्षनेता विधानसभा/ विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
८) सर्व मा. संसद सदस्य/महाराष्ट्र विधानसभा सदस्य /महाराष्ट्र विधानपरिषद सदस्य
९) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
१०) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ, एपीजे हाऊस, मुंबई.
१७) राज्य सूचना अधिकारी, राज्य सूचना विज्ञान केंद्र, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१८) संचालक, माहिती तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
१९) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२०) सर्व उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२२) निवडनस्ती (१४-अे कार्यासन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.